व्यसनमुक्ती धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी या क्षेत्रात मौलिक काम करीत असलेल्या व्यसनमुक्ती केंद्राना महात्मा गांधी व्यसनमुक्ती सल्ला, उपचार व पुनर्वसन योजनेंतर्गत अर्थसहाय्य देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : डीडीपी-२०२३/प्र.क्र.१५४ /सामासु**

विस्तार भवन, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

**दिनांक : १६ मार्च, २०२४**

**वाचा:-** १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. डीडीपी-२००९/प्र.क्र.१४९/ सुधार-१, दि. १७.०८.२०११

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. डीडीपी-२०१२/प्र.क्र. ५७७/ सामासु, दि. २९.३.२०१३

३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. डीडीपी-२०१८/प्र.क्र. ३१२/ सामासु, दि. २०.०९.२०१९

**प्रस्तावना:-**

भारताच्या राज्यघटनेतील अनुच्छेद ४७ मधील सार्वजनिक आरोग्य व जनतेच्या आरोग्य रक्षणासाठी (औषधीय प्रयोजना व्यतिरिक्त) मादक पदार्थावरील बंदीचे मार्गदर्शक तत्व समाविष्ट करण्यात आले आहे. त्यानुसार राज्याचे व्यसनमुक्ती धोरण निश्चित करण्यात आले असून या विभागाच्या संदर्भ १ येथील दिनांक १७ ऑगस्ट २०११ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याचे व्यसनमुक्ती धोरण जाहिर करण्यात आले आहे. या धोरणाचे प्रभावीपणे काम करणाऱ्या व्यसनमुक्ती केंद्राचे आर्थिक सक्षमीकरण करण्यासाठी केंद्राच्या धर्तीवर व्यसनमुक्ती केंद्राना अर्थसहाय्य करणारी महात्मा गांधी व्यसनमुक्ती सल्ला, उपचार व पुनर्वसन योजना सुरु करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.२ येथील दि. २९ मार्च,२०१३ च्या शासन निर्णयान्वये प्रत्येक महसूल विभागातून २ याप्रमाणे व्यसनमुक्ती क्षेत्रामध्ये कार्य करणाऱ्या एकूण १२ व्यसनमुक्ती संस्थांना प्रत्येकी रु. ११.०० लाख इतके अर्थसहाय्य देण्याची योजना आहे. राज्यात कार्यरत असणाऱ्या व्यसनमुक्ती सल्ला, उपचार व पुनर्वसन केंद्रामार्फत प्रचार व प्रसार करणाऱ्या सेवाभावी संस्थांना प्रोत्साहनपर अर्थसहाय्य देण्यासंबंधीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

व्यसनमुक्ती धोरणाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी राज्यात कार्यरत असणाऱ्या व्यसनमुक्ती सल्ला, उपचार व पुनर्वसन केंद्रामार्फत व्यसनमुक्ती प्रचार व प्रसार करणाऱ्या व या क्षेत्रात उल्लेखनीय कार्य करणाऱ्या सेवाभावी संस्थांना महात्मा गांधी व्यसनमुक्ती सल्ला, उपचार व पुनर्वसन

योजनेंतर्गत अर्थसहाय्य देण्यासाठी मा. मुख्यमंत्री (सा.न्या.) महोदयांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय निवड समितीच्या दि. १५/०२/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत, आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावावर, विचारविनिमय करुन पात्र १२ व्यसनमुक्ती केंद्रांना प्रत्येकी रु. ११.०० लाख अनुदान देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. पात्र संस्थांची यादी परिशिष्ट-अ मध्ये दर्शविण्यात आली आहे. त्यानुसार आयुक्त समाजकल्याण महाराष्ट्र राज्य , पुणे यांनी सदरची तरतूद आहरित करुन संबंधित संस्था / केंद्र यांना वितरीत करावी.

२. या प्रयोजनाकरीता आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रयोजनासाठी येणारा खर्च, सन २०२३ - २०२४ या आर्थिक वर्षातील मागणी क्र. एन-३, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण-१०५, दारुबंदी, (०२) स्वयंसेवी संघटनांना सहाय्य, (०२) (०१) व्यसनाधीन व्यक्तींसाठी अंमली पदार्थ सेवन विरोधी मोहीम चालविणे, त्यांच्यावर उपचार करणे, व्यसनाधीन व्यक्तींचे पुनर्वसन करणे याकरिता स्वयंसेवी संघटनांना वित्तीय सहाय्य, (२२३५ १७५५) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षातंर्गत भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध केले असुन त्याचा संगणक सांकेताक क्रमांक २०२४०३१६१६३५२७०५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJESH SADASHIV MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2024.03.16 16:45:09 +05'30'

**सोबत :- परिशिष्ट "अ"**

**(राजेश मांजरेकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
सचिव (सा.न्या.) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग
सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
निवड नस्ती, सामासु.

(शा. नि. क्र. डीडीपी २०२३ /प्र.क्र. १५४ / सामासु, दि. १६ मार्च,२०२४)

## परिशिष्ट – अ

## ( सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील लाभार्थ्यांची यादी )

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | संस्था | व्यसनमुक्ती केंद्र |
|---|---|---|---|---|
| १. | पुणे | सांगली | प्रिन्स शिक्षण संस्था येवलेवाडी, मु.पो. येवलेवाडी ता. वाळवा जि.सांगली | प्रिन्स व्यसनमुक्ती केंद्र, जिल्हा मध्यवर्ती बँकसमोर, शिराळा, जि. सांगली. |
| २ | | पुणे | कै. अंकुशराव लांडगे शैक्षणिक व सामाजिक ट्रस्ट, लांडगे वस्ती, रोशेल गार्डन मागे, चक्रपाणी वसाहत, भोसरी, जि. पुणे | होप मानसिक पुनर्वसन व व्यसनमुक्ती केंद्र, लांडगे वस्ती, रोशेल गार्डन मागे, चक्रपाणी वसाहत, भोसरी, जि. पुणे |
| ३ | मुंबई | रत्नागिरी | भारतीय कष्टकरी रयत सेवा संस्था, मु.पो. कोंडये, ता. लांजा, जि. रत्नागिरी | भारतीय कष्टकरी रयत सेवा संस्था, मु.पो. कोंडये, ता. लांजा, जि. रत्नागिरी |
| ४ | | ठाणे | याज्ञिका फाउंडेशन रिहॅबिलीटेशन ॲण्ड डी. एडिक्शन सेंटर धावणी रोड, रॉयल इंग्लीश शाळेसमोर, उत्तन भाईंदर (प.) ठाणे-४०११०१. | याज्ञिका फाउंडेशन रिहॅबिलीटेशन ॲण्ड डी. एडिक्शन सेंटर धावणी रोड, रॉयल इंग्लीश शाळेसमोर, उत्तन भाईंदर (प.), ठाणे-४०११०१. |
| ५ | नाशिक | जळगांव | श्री. सत्यसाई सेवा सांस्कृतिक सामाजिक शैक्षणिक मंडळ, खेडगाव ता. जळगाव जि.जळगांव | श्री. सत्यसाई सेवा सांस्कृतिक सामाजिक शैक्षणिक मंडळ व्यसनमुक्ती केंद्र, अनुसया नगर, चाळीसगांव, जि. जळगांव |
| ६ | | जळगाव | श्रीकृष्ण महिला व बालकल्याण आणि अपंग पुनर्वसन विकास मंडळ, घोडगांव, ता. चोपडा, जि. जळगांव. | श्रीकृष्ण महिला व बालकल्याण आणि अपंग पुनर्वसन विकास मंडळ, घोडगांव व्यसनमुक्ती केंद्र, पंकज नगर, चोपडा, ता. जि. जळगांव. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ७ | औरंगाबाद | धाराशिव | यश मेडिकल फाउंडेशन, बार्शी रोड, येरमाळा ता. कळंब, जि. धाराशिव | महात्मा गांधी सल्ला, उपचार व पुनर्वसन केंद्र, बार्शी रोड , येरमाळा ता. कळंब, जि. धाराशिव |
| ८ | | हिंगोली | स्व.कलावतीबाई देशमुख बहुउद्देशीय सेवा भावी संस्था हदगाव, ता. हदगांव, जि. नांदेड | साई व्यसनमुक्ती सल्ला प्रचार व प्रसार केंद्र, हिंगोली, ता.जि. हिंगोली. |
| ९ | अमरावती | यवतमाळ | संत तुकडोजी महाराज आदिवासी बहुउद्देशीय संस्था, यवतमाळ | महात्मा गांधी व्यसनमुक्ती केंद्र व सल्ला उपचार व पुनर्वसन केंद्र, तायडे नगर, नागपूर रोड, जि. यवतमाळ. |
| १० | | वाशिम | अन्नपूर्णा शिक्षण संस्था किनिराजा, स्वामी विवेकानंद नगर, लाखाला, ता. मालेगाव, जि. वाशिम | अन्नपूर्णा शिक्षण संस्था किनिराजा, ता. मालेगाव, जि. वाशिम |
| ११ | नागपूर | गडचिरोली | वेधांती बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, मौजा. आंधळी ता. कुरखेडा जि. गडचिरोली | वेधांती बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, हिवसे हाऊस, महिला महाविद्यालयासमोर, रेव्हेन्यु कॉलनी, जि. गडचिरोली. |
| १२ | | गडचिरोली | प्रकाश व्यसनमुक्ती उपचार व संशोधन केंद्र, ता. देसाईगंज जि. गडचिरोली | प्रकाश व्यसनमुक्ती उपचार व संशोधन केंद्र, ता. देसाईगंज, जि. गडचिरोली |

RAJESH SADASHIV MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2024.03.16 16:45:56 +05'30'

**( राजेश मांजरेकर )**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**